मौ.प्रकाशा ता.शहादा जि.नंदुरबार येथील
पाणी पुरवठा योजना अंदाजपत्रकास व
आराखडयास प्रशासकीय मान्यता

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्र. ग्रापापु- २००८ / प्र.क्र. १६८ /पापु-०९
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ९.११.२००९

संदर्भ : मुख्य अभियंता,मजीप्रा,नाशिक यांचे पत्र क्र.मुअ/नाशिक/तांशा/१५३९/१८०८/२००७ दि.९.८.०७

**प्रस्तावना :-** मौ.प्रकाशा हे गाव धार्मिक स्थळ असल्याने तेथे यात्रेच्या कालावधीत येणा-या यात्रेकरुंना तसेच गावाच्या लोकसंख्येत वाढ झाल्याने सद्यस्थितीत गावात पिण्याच्या पाण्याची तीव्र टंचाई भासत आहे.सदर बाब विचारात घेऊन मौ.प्रकाशा पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देणे व सदर योजना आदिवासी उप योजनेअंतर्गत येत असल्याने सदर योजनेस अनुज्ञेय निधी शासकीय आदिवासी उपयोजनेखाली मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

प्रस्तावनेमध्ये नमुद केलेल्या बाबी तसेच सदर योजनेच्या ९५% शासकीय अनुदानाची रक्कम रु. १३३.७४ लक्ष जुलै ०९ च्या अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीव्दारे आदिवासी उपयोजना सन २००९-१० करिता अर्थसंकल्पीत केला आहे हे विचाारात घेऊन मौ. प्रकाशा ता. शहादा जि. नंदुरबार पाणी पुरवठा योजनेच्या रुपये १४०.७८ लक्ष ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

मौ.प्रकाशा पाणी पुरवठा योजनेचा वित्तीय आकृतीबंध खालीलप्रमाणे राहील.

| | |
|---|---|
| मौ.प्रकाशा पाणी पुरवठा योजना (ढोबळ किंमत) | रु. १४०.७८ |
| शासकीय अुनदान (९५% ) | रु. १३३.७४ |
| लोकवर्गणी (५ % ) | रु. ७.०४ |

२. सदर योजनेस खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत करण्यात येईल.
२. सदर योजनेच्या किंमतीच्या ५ % लोकवर्गणीची रक्कम ग्रामपंचायत प्रकाशा यांनी भरण्यात यावी. लोकवर्गणी भरण्याबाबतचा ठराव ग्रामपंचायताकडून घेतल्यानंतर व लोकवर्गणी प्राप्त झाल्यानंतर योजनेच्या कामास सुरुवात करावी.
३. ही योजना चालवण्यासाठी व देखभाल -दुरुस्तीसाठी येणारा खर्च संबंधित ग्रामपंचायतीने त्यांच्या पाणीपट्टी उत्पन्नातून भागवावा. त्यातून योजनेची देखभाल दुरुस्ती करावी,त्यासाठी शासनातर्फे अनुदान देण्यात येणार नाही.

४. कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

३. सदर योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्यात येईल. योजनेतील कामे पुर्ण होताच ग्रामपंचायत प्रकाशा यांना हस्तांतरीत करण्यात येईल. योजनेतील कामे पुर्ण करुन यशस्वीरित्या चाचणी दिल्यानंतर योजनेचे दैनंदिन कार्यान्वयन देखभाल व दुरुस्तीसाठी ग्रामपंचायतीने ताब्यात घेणे बंधनकारक राहील.

४. या योजनेवर होणारा हा खर्च मागणी क्र.टी-५ २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता,पंचवार्षिक योजनांतर्गत योजना ०१-पाणी पुरवठा - ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०१) ग्रामीण भागामध्ये नळ पाणी पुरवठा योजना ( २२१५०५०६) ४१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखाली उपलब्ध तरतुदी मधून भागविण्यात यावा.

५. सदर निधी वितरणाबाबतचे आदेश स्वतंत्ररित्या काढण्यात येत आहेत.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक विअप्र- १०००/प्र क्र ४६/२००१/विनियम,आी दि.११ जुलै २००१ मधील उपविभाग - ३ खालील परिच्छेद क्र.२७ (२) नुसार विभागास प्रधान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९११०९१६४६४४००१ असा आहे.

(ज.र.गणेकर)
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रति,

सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,एक्सप्रेस टॉवर्स,मुंबई -२१
विभागीय आयुक्त,नाशिक विभाग,नाशिक
मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक
मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, नंदुरबार
जिल्हाधिकारी, नंदुरबार
अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नाशिक
कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग,जळगाव
कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद,जि. जळगाव
महालेखापाल,लेखा व अनुज्ञेयता,महाराष्ट्र-१,मुंबई /महाराष्ट्र २ नागपूर
महालेखापाल,लेखा परिक्षा ,महाराष्ट्र-१,मुंबई /महाराष्ट्र २ नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई
मा.मंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
मा.रा.मंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
प्रधान सचिव, ,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय,मुंबई
कार्यसन क्रमांक पा पु -०४, ०५,०६,०७,०८,१३,१७,१८,संगणक कक्ष पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
निवड नस्ती कार्यासन पापु -०९